**उर्दू भाषेतील लेखक/कवी यांना त्यांच्या साहित्यिक कृतींचे प्रकाशन व अर्थसहाय्य मंजूर करण्यापूर्वी प्राप्त हस्तलिखित वर्गवारी व परिक्षकांच्या मानधन मंजूरीबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः उसाअ-२०१५/प्र.क्र.२/उसाअ/का.४**

दालन क्र.७१४, ७ वा माळा, मंत्रालय (विस्तार),
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
तारीख: ३० जुलै, २०१५

वाचा

**शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांकः इयुए-१०७५/एल-जेजे, दि.१६/०४/१९७५.**

**प्रस्तावना**

उपरोक्त शासन निर्णयात महाराष्ट्र राज्य उर्दू अकादमीच्या स्थापनेची उद्दिष्टे नमूद करण्यात आलेली असून या उद्दिष्टांपैकी एक उद्दिष्ट हे "उर्दू भाषेतील लेखक, कवी यांना त्यांच्या साहित्यिक कृतींचे प्रकाशन करण्याकरिता अर्थसहाय्य देणे", असे आहे. सदर उद्दिष्टास अनुसरुन, प्रत्येक वर्षी (कॅलण्डर वर्ष) महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमीमार्फत उर्दू वर्तमानपत्रांत जाहिरात देवून उर्दू कवी/लेखकांकडून पुस्तकांची हस्तलिखिते मागविण्यात येतात. त्यानुसार प्राप्त झालेल्या हस्तलिखितांच्या उर्दू भाषेचे नामवंत लेखक/कवी/विचारवंत तज्ञांकडून छाननी करुन पात्र हस्तलिखितांसाठी सहायक अनुदान प्रदान करण्यात येते. या हस्तलिखितांची वर्गवारी विहित करणे व परिक्षकांचे मानधन निश्चित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**

१. महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमीमार्फत उर्दू भाषेच्या विकासासाठी राबविण्यात येणाऱ्या योजनेनुसार उर्दू भाषेतील लेखक/कवी/विचारवंत यांना त्यांच्या साहित्यिक कृतींचे प्रकाशन व अर्थसहाय्य मंजूर करण्यापूर्वी पुस्तकांची (हस्तलिखित) निवड करण्याकरिता खालील तक्त्यात नमूद वर्गवारीला व या प्रत्येक वर्गवारीकरिता २ परिक्षक नियुक्त करण्यास मान्यता देण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

| अ.क्र. | वर्गवारी |
|---|---|
| १ | टिकात्मक/संशोधन/ऐतिहासिक |
| २ | आत्मचरित्रे/प्रवास वर्णन/विज्ञान/तांत्रिक/खेळ |
| ३ | कथा/कादंबरी/नाटय लेखन/इतर |
| ४ | काव्यसंग्रह |
| ५ | हास्यव्यंग/विनोदी लेखन |
| ६ | अनुवाद/निबंध/अफसाना/संग्रह |
| ७ | बाल-साहित्य |

२. वर नमूद केल्याप्रमाणे नियुक्त केल्या जाणाऱ्या परिक्षकांना मानधन, प्रवासखर्च व राहण्याचा व जेवणाचा खर्च म्हणून ठोक रु.१०,०००/- प्रत्येकी अनुज्ञेय असेल.

३. परिक्षकांनी निवड केलेल्या हस्तलिखित प्रकाशनासाठी रक्कम मंजूरीचे अधिकार अकादमीच्या कार्यकारी मंडळास राहील.

४. परिक्षकांनी संमती दिलेल्या हस्तलिखितांच्या लेखकांकडून हस्तलिखितांची डिटीपी प्राप्त झाल्यानंतरच अर्थसहाय्याच्या अनुदानाची रक्कम देण्यात यावी.

५. ज्या पुस्तकाच्या प्रकाशनासाठी अनुदान दिले जाईल ते अनुदान त्याच पुस्तकाच्या प्रकाशनासाठी वापरण्यात येत आहे, हे सुनिश्चित करण्याची जबाबदारी अधिक्षक-नि-कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमी, मुंबई यांची राहील.

६. अकादमीला सादर करण्यात आलेल्या हस्तलिखितामध्ये कुठल्याही प्रकारचा फेरबदल करण्यात येवू नये. तसे करावयाचे असल्यास त्यासाठी उर्दू अकादमीची पूर्व मंजूरी घेणे आवश्यक राहील. तसेच पुस्तकाच्या सुरुवातीच्या आतील प्रथम पृष्ठांवर या पुस्तकाच्या प्रकाशनासाठी महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमीतर्फे सहायक अनुदान मिळाल्याबाबतची नोंद असणे आवश्यक असेल.

७. या योजनेसाठी होणारा खर्च "मागणी क्र. झेडई-०१, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २०० इतर कार्यक्रम ०१-अल्पसंख्यांकांना सहाय्य, राज्य योजनांतर्गत योजना (०१) (२३) महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमीच्या विविध योजनांसाठी सहायक अनुदान राज्य अंतर्गत योजना (२२३५ बी ०९४) ३१-सहायक अनुदान" लेखाशीर्षाखाली खर्ची घालून तो प्रत्येक आर्थिक वर्षात मंजूर होणाऱ्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७३११२४४४७६२१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Anees Iqbal Ismail Shaikh

Digitally signed by Anees Iqbal Ismail Shaikh
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=447981acddcc5079f9c00eadfad2054d955a80a21de6164c4024daf5a9ea2c97, cn=Anees Iqbal Ismail Shaikh
Date: 2015.07.31 15:53:30 +05'30'

**( अनिस शेख )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई (रोख कार्यासनामार्फत)
३. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
४. प्रधान सचिव, अल्पसंख्यांक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
५. सहसचिव, अल्पसंख्यांक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई

६. अवर सचिव, अल्पसंख्यांक विकास विभाग (का-७)
७. अवर सचिव, अल्पसंख्यांक विकास विभाग (का-२)
८. कक्ष अधिकारी, रोख कार्यासन, अल्पसंख्यांक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई (४ प्रती)
९. कार्याध्यक्ष, महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमी, मुंबई (अकादमीच्या कार्यालयामार्फत)
१०. कक्ष अधिकारी (का-४), अल्पसंख्यांक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
११. निवड नस्ती (का.४)